शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयांतील अध्यापकांना गुणवत्ता दर्जा सुधार (QIP) योजनेंतर्गत उच्च शिक्षणाकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन आदेश क्रमांकः-प्रतिनि-२०२५/प्र.क्र.(२९/२५)/तांशि-१**
मंत्रालय विस्तार इमारत,हुतात्मा राजगुरू चौक
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०७ मार्च, २०२५.

**संदर्भ :** १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्रमांक-प्रतिनि-३५२०/प्र.क्र.(९९/२०)/तांशि-७, दिनांक २४/०२/२०२१.
२) संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र.४/आस्था-३/पदवी-क्युआयपी/२०२४-२५/४८, दिनांक ०३/०२/२०२५.

**शासन आदेशः-**

शासकीय व अशासकीय अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालयांमध्ये कार्यरत असलेल्या निम्नलिखित अध्यापकांची त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ४ येथे दर्शविलेल्या संस्थेत गुणवत्ता दर्जा सुधार योजनेंतर्गत (Quality Improvement program) उच्च शिक्षणासाठी (पी.एच.डी अभ्यासक्रमासाठी) सन २०२५-२६ या शैक्षणिक वर्षापासून पुढील ०३ वर्षांकरीता निवड झाली आहे :-

| अ क्र | अध्यापकाचे नाव व पदनाम | कार्यरत असलेल्या संस्थेचे नाव | पी.एच.डी. करीता निवड झालेल्या संस्थेचे नाव |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| **शासकीय पदवी संस्था (पी.एच.डी. अभ्यासक्रमाकरिता)** | | | |
| १ | श्री. वाल्मिक अशोक गव्हाणे, सहायक प्राध्यापक (विद्युत अभियांत्रिकी) | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर | आय.आय.टी. गुवाहाटी (NIRF Rank 07 ) |
| २ | श्रीम. गीतांजली शरद धेंडे, सहाय्यक प्राध्यापक (यंत्र अभियांत्रिकी) | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड | आय.आय.टी. धारवाड (No NIRF Rank ) |
| **अशासकीय अनुदानित पदवी संस्था (पी.एच.डी. अभ्यासक्रमाकरिता)** | | | |
| ३ | श्री. सुदर्शन प्रभाकरराव गाजरे, सहाय्यक प्राध्यापक (यंत्र अभियांत्रिकी) | वीरमाता जिजाबाई तंत्रज्ञान संस्था, मुंबई | आय.आय.टी. दिल्ली Rank 02 |

२. संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये गुणवत्ता दर्जा सुधार योजनेंतर्गत शासकीय अभियांत्रिकी/ औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये, शासकीय तंत्रनिकेतने व अशासकीय अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालयांमधील अध्यापकांना उच्च शिक्षणाकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्यासाठी सुधारीत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर मार्गदर्शक सूचनांनुसार

अध्यापकांना पी.एच.डी अभ्यासक्रमाकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्याकरिता पात्रता निकष व प्रतिनियुक्तीवर जाण्यासाठी उमेदवारांस प्रवेश मिळालेल्या संस्थांचे प्राधान्यक्रम निश्चित करण्यात आले आहेत. सदर पात्रता/ निकष व प्राधान्यक्रम विचारात घेता, संचालक, तंत्रशिक्षण, संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली गठीत निवड समितीच्या शिफारशीच्या अनुषंगाने, उपरोक्त अध्यापकांना सन २०२५-२६ या शैक्षणिक वर्षापासून ०३ वर्षाच्या कालावधीसाठी पी.एच.डी अभ्यासक्रमाकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

३. संबंधित अध्यापकांना प्रतिनियुक्तीसाठी कार्यमुक्त करण्यापूर्वी संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयामधील अ.क्र. १ (अ) (९) नुसार अध्यापकांकडून हमीपत्र घेण्याची दक्षता संचालक, तंत्रशिक्षण, संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांनी घ्यावी. सदर अध्यापकांना संबंधित संस्थेतून कार्यमुक्त केल्याच्या दिनांकापासून त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी सुरु होईल.

४. संबंधित अध्यापकांना संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयामधील अ.क्र. १ (अ) (६) ते (१४) येथील अटी व शर्ती लागू राहतील.

५. संबंधित अध्यापकांनी पी.एच.डी अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयामधील अ.क्र.४ “अपेक्षित उपक्रम” या शीर्षाखाली नमूद उपक्रम/ जबाबदाऱ्या पूर्ण करणे आवश्यक आहे. संबंधित अध्यापकांनी सदर जबाबदाऱ्या पूर्ण केल्या आहेत किंवा कसे याबाबत वस्तुनिष्ठ अहवाल प्रतिवर्षी स्वयंमूल्य निर्धारण अहवालासोबत जोडणे आवश्यक राहील व त्याची नोंद स्वयंमुल्य निर्धारण अहवालात प्रतिवर्षी घेतली जाईल.

६. असे प्रमाणित करण्यांत येते की, उपरोक्त अध्यापकांना गुणवत्ता दर्जा सुधार कार्यक्रमा (QIP) नुसार पी.एच.डी. अभ्यासक्रमासाठी प्रतिनियुक्तीवर पाठविण्यात आले नसते तर, वरील अभ्यासक्रमाच्या काळात ते त्याच पदावर स्थानापन्न राहीले असते.

७. सदर आदेश सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashatra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०७१२२४१५३९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PAGARE SHRIKRISHNA KASHINATH

Digitally signed by PAGARE SHRIKRISHNA KASHINATH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=cc78d6dbb4fe0c3d5473ed374dc1007ae7db08a8a6ca9468ce2a8aae16c0cb06, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=4E8BC157609C105D396B04018FA47F8909333AFC18DDC3893CC043F18F759C0B, cn=PAGARE SHRIKRISHNA KASHINATH
Date: 2025.03.07 12:26:40 +05'30'

**(श्रीकृष्ण पगारे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति :**

संबंधित अध्यापक (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत :-**

१. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक.
४. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई/पुणे/छत्रपती संभाजीनगर.
६. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर/कराड.
७. प्राचार्य, वीरमाता जिजाबाई तंत्रज्ञान संस्था, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/छत्रपती संभाजीनगर.
१०.निवड नस्ती/तांशि-१.